**सन २०१९-२० करिता राष्ट्रीय कृषि विकास योजना-रफ्तार योजनेंतर्गत सर्वसाधारण प्रवर्गासाठी वितरीत केलेल्या निधीपैकी ₹३८.६५ कोटी निधीचे पुर्नवितरण करणे.**

**महाराष्ट्र शासनन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: राकृवि ०३१९ /प्र.क्र. ८८/१४-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०४२
दिनांक : १६ नोव्हेंबर, २०१९.

**संदर्भ :**

१. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.०४१८/प्र.क्र.१५५/१४-अे, दि. २७/०४/२०१७
२. वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.०१.०४.२०१९
३. कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, केंद्रिय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. ७-१/२०१९- आरकेव्हीवाय, दि. २२/०२/२०१८
४. राज्य स्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या (SLSC) २६ व्या बैठकीचे इतिवृत्त- पत्र क्र. आरकेव्ही-१२१८/प्र.क्र.३३८/१४-अे, दि. २३/०३/२०१९, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
५. कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, केंद्रिय कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. १-१५/२०१९ आरकेव्हीवाय/१, दि. ०६/०६/२०१९
६. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राकृवि ०३१९ /प्र.क्र. ८८/१४-अे, दि. २९/०६/२०१९.
७. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राकृवि ०३१९ /प्र.क्र. ८८/१४-अे, दि. २७/०८/२०१९
८. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.कृआ/नि/राकृवियो/नि.मा./१००३, दि. ०१/१०/२०१९.

**प्रस्तावना :**

राष्ट्रीय कृषि विकास योजना - रफ्तार ही योजना केंद्र व राज्य शासनाच्या अनुक्रमे ६०:४० प्रमाणात अर्थसहाय्याने राबविण्यात येत असून या योजनेंतर्गत सर्वसाधारण राकृवियो करिता (Normal RKVY) केंद्र शासनाने संदर्भांकित दि. २२/०२/२०१९ रोजीच्या पत्रान्वये महाराष्ट्रास सन २०१९-२० करिता एकूण ₹ ४१८.४५ कोटी (केंद्र हिस्याचे ₹२५१.०७ कोटी + राज्य हिस्याचे ₹१६७.३८ कोटी ) रक्कमेचे वार्षिक नियतवाटप (Allocation) मंजूर केले आहे.

केंद्र शासनाने दि.०६/०६/२०१९ रोजीच्या संदर्भाधिन पत्रान्वये राज्यास सर्वसाधारण प्रवर्गाचा केंद्र हिस्याचा पहिल्या हप्त्याचा ₹९३.३७ कोटी निधी वितरीत केला होता. केंद्र शासनाने वितरीत केलेला सदर निधी व त्या समरुप राज्य हिस्याचा ₹६२.२४ कोटी निधी असा सर्वसाधारण प्रवर्गाकरिता एकूण ₹१५५.६१ कोटी निधी संदर्भ क्र. ६ येथील दि. २९/०६/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये आयुक्त (कृषि) यांना वितरीत करण्यात आलेला आहे. सदर शासन निर्णयान्वये ₹१५५.६१ कोटी निधीपैकी ₹७२.१३ कोटी निधीचे प्रकल्पनिहाय वितरण व संदर्भ क्र.७ येथील दि.२७/०८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये उर्वरित ₹८३.४८ कोटी निधीचे प्रकल्पनिहाय वितरण करण्यात

आलेले आहे. तथापि संदर्भ क्र. ६ येथील शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेल्या रु. ७२.१३ कोटी निधीपैकी रु.२४.७५ कोटी निधी कृषि व कृषि संलग्न विभागाच्या ऑक्टोंबर २०१९ अखेर खर्च होण्याच्या शक्यतेनुसार मंजूर प्रकल्पांकरिता केलेल्या मागणीआधारे आयुक्तालय स्तरावरुन वितरीत करण्यात आला असून सद्य:स्थितीत रु.४७.३८ कोटी निधी मागणी अभावी आयुक्तालय स्तरावर वितरणास उपलब्ध असल्यामुळे कृषि आयुक्तालय कार्यालयाने संदर्भ क्र. ८ वरील पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार रु.३८.६५ कोटी निधीचे पुनर्वितरण करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णयः**

१. सन २०१९-२० मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत सर्वसाधारण प्रवर्गाकरिता एकूण रु. १५५.६१ कोटी निधी संदर्भ क्र. ६ येथील दि. २९/०६/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये आयुक्त (कृषि) यांना वितरीत करण्यात आलेला आहे. सदर निधीपैकी रु.३८.६५ कोटी (रुपये अडतीस कोटी पासष्ठ लाख फक्त) निधी अद्याप अखर्चित असून त्याचा तपशील परिशिष्ट- अ मध्ये दर्शविला आहे. सबब सदर रु.३८.६५ कोटी निधी पुर्नवितरीत करण्यात येत असून त्याचा प्रकल्पनिहाय / अंमलबजावणी यंत्रणानिहाय तपशील परिशिष्ट-ब मध्ये दर्शविला आहे.

२. राष्ट्रीय कृषि विकास योजना - रफ्तार या योजनेंतर्गत मंजूर प्रकल्पांच्या अंमलबजावणीसाठी सर्वसाधारण प्रवर्गाकरिता उपलब्ध होणाऱ्या निधीचा विनियोग करताना दि.२९/०६/२०१९ रोजीच्या शासन निर्णयातील सूचना / कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा.

३. या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यांत येत असलेला निधी संबंधित अंमलबजावणी यंत्रणांच्या मागणीनुसार वितरीत करण्यात येत आहे तथापि, राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या २७ व्या राज्य स्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या बैठकीत समितीने निदेशीत केल्यानुसार, सन २०१९-२० मध्ये वितरीत करण्यात येत असलेल्या निधीचा प्राधान्याने जुने अपूर्ण प्रकल्प पूर्ण करण्यासाठी वापर करण्याची जबाबदारी संबंधित अंमलबजावणी यंत्रणांची राहील. कोणत्याही नवीन अथवा जुन्या प्रकल्पांतर्गत निधी अभावी प्रलंबित देयकांचे दायित्व निर्माण होणार नाही याची संबंधित अंमलबजावणी यंत्रणा व प्रशासकीय विभागांनी दक्षता घ्यावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१११६१२५८५३१७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**सहपत्र :- परिशिष्ट - "अ" व "ब"**

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: CN = Shrikant Chandrakant Andge, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Agriculture and ADF Department
Date: 2019.11.16 15:24:12 +05'30'

तथापि असलेला

**(श्रीकांत चं. आंडगे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई

२. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव (पदुम व पणन), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. सचिव (जलसंधारण), मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. व्यवस्थापकीय संचालक (MSHMPB), कृषि आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे
१०. आयुक्त (पशुसंवर्धन), औंध, पुणे
११. आयुक्त (दुग्धव्यवसाय), वरळी, मुंबई
१२. आयुक्त (मत्स्यव्यवसाय), मरीन ड्राईव्ह, मुंबई
१३. महासंचालक, महाराष्ट्र राज्य कृषि शिक्षण व संशोधन परिषद, भांबुर्डा, भोसले नगर, पुणे.
१४. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
१५. संचालक (प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
१६. संचालक (रेशीम), विभागीय आयुक्तालय परिसर, सिव्हील लाईन्स, नागपूर
१७. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, गुलटेकडी, मार्केट यार्ड, पुणे
१८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, गुलटेकडी, मार्केट यार्ड, पुणे
१९. महालेखाकार (स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई.
२०. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
२१. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य
२२. सहायक संचालकीी (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
२३. वित्त विभाग (कार्या. व्यय-१ / अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई
२४. मा. मंत्री (कृषि व फलोत्पादन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
२५. निवड नस्ती.

## परिशिष्ठ - अ

कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

शाासन निर्णय क्र. राकृवि ०३१९ /प्र.क्र. ८८/१४-अे , दि. १६/११/२०१९ चे सहपत्र

राष्ट्रीय कृषी विकास योजनेंतर्गत दि. २९/०६/२०१९चे शासन निर्णयान्वये वितरीत केलेला तथापि अंमलबजावणी यंत्रणांच्या प्रत्यक्ष मागणीप्रमाणे निधी वितरीत केल्यानंतर शिल्लक राहिलेला निधी

वर्ष - २०१९-२० (रक्कम रु. कोटीत)

| अ.क्र. | प्रकल्पाचे नाव | प्रकल्प मंजूरीचे वर्ष | प्रकल्पाची किंमत (राकृवियो हिस्सा) | सर्वसाधारण प्रवर्गासाठी दि.२९/०६/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी | अंमलबजावणी यंत्रणांच्या प्रत्यक्ष मागणीप्रमाणे वितरीत निधी | पुर्नवितरणाकरित ा शिल्लक निधी |
|---|---|---|---|---|---|---|
| 1 | बीज गुणन केंद्राच्या प्रक्षेत्रावर विविध कृषि हवामान क्षेत्रानुकुल वैरणीच्या पिकांचे बियाणे / ठोंबाचे उत्पादन तथा पिक प्रात्यक्षिक व विकास | २०१७-१८ | ३.०० | ०.२० | ०.०० | ०.२० |
| **अ** | **आयुक्त (कृषि)** | | **३.००** | **०.२०** | **०.००** | **०.२०** |
| २ | ३१ कृषी उत्पन्न बाजार समित्यांमध्ये धान्य चाळणी व प्रतवारी यंत्र उभारणी प्रकल्प | २०१७-१८ | ५.०५ | २.२७ | ०.०० | २.२७ |
| ३ | १०८ कृषी उत्पन्न बाजार समित्यांमध्ये शेतमाल तारण सुविधेकरिता गोदाम उभारणी प्रकल्प | २०१७-१८ | ४१.८६ | २७.४६ | ८.७३ | १८.७३ |
| **ब** | **व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ** | | **४६.९१** | **२९.७३** | **८.७३** | **२१.००** |
| ४ | आदिवासी भागातील वखार महामंडळाच्या गोदामांना गॅल्व्हालाईन पत्र्यांचे नवीन छत, ग्रील रोलींग शटर, ॲप्रोच रोड, ॲप्रन गटर व कंपाउंड भिंतीच्या सुविधा उपलब्ध करुन देऊन गोदामांचा दर्जा उंचावणे. | २०१८-१९ | ५४.८१ | १६.७५ | ०.०० | १६.७५ |
| **क** | **व्यवस्थापकीय संचालक (वखार महामंडळ)** | | **५४.८१** | **१६.७५** | **०.००** | **१६.७५** |
| ५ | डॉ. पं.दे.कृ.वि. विकसित पिक व्यवस्थापन तंत्रज्ञानाचा प्रसार | २०१५-१६ | ९.०१ | १.४० | ०.७० | ०.७० |
| **ड** | **डॉ. पंजाबराव देशमुख कृषी विद्यापीठ, अकोला** | | **९.०१** | **१.४०** | **०.७०** | **०.७०** |
| **एकूण (अ+ब+क+ड)** | | | **११३.७३** | **४८.०८** | **९.४३** | **३८.६५** |

**परिशिष्ठ - ब**

कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

शाासन निर्णय क्र. राकृवि ०३१९ /प्र.क्र. ८८/१४-अे , दि. १६/११/२०१९ चे सहपत्र

राष्ट्रीय कृषी विकास योजनेंतर्गत प्रकल्प निहाय / अंमलबजावणी यंत्रणा निहाय सर्वसाधारण प्रवर्गासाठी रु. ३८.६५ कोटी निधीचे पुर्नवितरण

वर्ष - २०१९-२० (रक्कम रु. कोटीत)

| अ. क्र. | प्रकल्पाचे नाव | प्रकल्प मंजूरीचे वर्ष | प्रकल्प किंमत | प्रकल्प किंमतीपैकी राकृवियो हिस्सा | सन २०१८-१९ मध्ये वितरीत केलेला निधी | सन २०१९-२० करिता शिल्लक प्रकल्प किंमत | सन २०१९-२० मध्ये वितरीत केलेला निधी | वितरण बाकि असलेला निधी | सर्वसाधारण प्रवर्गासाठी वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ५ | ६ | ७ | ८ (६-७) | ९ | १० | ११ |
| १ | शेळी व मेंढी पैदासीकरण केंद्राचे बळकटीकरण करणे [पाडेगांव (औरंगाबाद), भीलाखेड (जळगांव), दहीवडी (सातारा), अंबेजोगाई (बीड), महूद (सोलापूर)] | २०१६-१७ | ६.२२ | ३.७५ | २.२२ | १.५३ | ०.०० | १.५३ | १.२० |
| २ | पशुवैद्यकीय जैव पदार्थ निर्मिती संस्थेमध्ये आदर्श उत्पादन पध्दतीचा (GEMP) अवलंब करुन राष्ट्रीय स्तरावरील संदर्भीय लस चाचणी व गुणवत्ता प्रयोगशाळेची स्थापना करणे, औंध, पुणे | २०१६-१७ | ४.६३ | ४.६३ | ३.६३ | १.०० | ०.०० | १.०० | १.०० |
| ३ | बहुवर्षीय वैरण पिकाची लागवड व उत्पादन आणि मुरघास तयार करणे | २०१६-१७ | ६.९७ | ४.१३ | ३.५३ | ०.६० | ०.०० | ०.६० | ०.६० |
| ४ | महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर अधिनस्त पशुवैद्यकीय महाविद्यालय नागपूर, मुंबई व परभणी येथील शैक्षणीक पशुचिकित्सालयाचे नुतनीकरण व बळकटीकरण तसेच पशुवैद्यकांकरिता प्रशिक्षण केंद्राची स्थापना करणे | २०१६-१७ | १६.५१ | १६.५१ | ६.४६ | १०.०५ | १.५० | ८.५५ | ५.०० |
| ५ | आयव्हीबीपी, पुणे येथे जीएमपी मापदंडानुसार व्यावसायीक लहान पशुसंवर्धन केंद्राची स्थापना | २०१७-१८ | १०.०० | १०.०० | ०.०० | १०.०० | १.४५ | ८.५५ | ५.०० |
| ६ | कृषि विज्ञान केंद्र, बारामती येथे पशुधन अनुवंश सुधारणे या उच्च गुणवत्ता केंद्राची स्थापना करणे. | २०१७-१८ | ३.४२ | ३.४२ | १.९६ | १.४६ | ०.०० | १.४६ | ०.६० |

| अ. क्र. | प्रकल्पाचे नाव | प्रकल्प मंजूरीचे वर्ष | प्रकल्प किंमत | प्रकल्प किंमतीपैकी राकृवियो हिस्सा | सन २०१८-१९ मध्ये वितरीत केलेला निधी | सन २०१९-२० करिता शिल्लक प्रकल्प किंमत | सन २०१९-२० मध्ये वितरीत केलेला निधी | वितरण बाकि असलेला निधी | सर्वसाधारण प्रवर्गासाठी वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ७ | आयव्हीबीपी, पुणे येथे अनअॅरोबीक लसीच्या (बीक्यू, ईटी) उत्पादनासाठी सुविधा स्थापन करणे. | २०१७-१८ | १०.०० | १०.०० | ०.०० | १०.०० | ०.०० | १०.०० | ५.०० |
| ८ | आयव्हीबीपी, पुणे येथे क्युसीच्या अपग्रेडेशन इंसीनेटर सुविधेची स्थापना करणे | २०१७-१८ | ०.५० | ०.५० | ०.०० | ०.५० | ०.०० | ०.५० | ०.५० |
| ९ | पोस्ट ग्रॅज्युएट इंस्टिटयूट ऑफ व्हेटनरी आणि पशुसंवर्धन विज्ञान कॉलेज अकोला येथे टी.व्ही.सी.सी. आणि डायग्नोसीस लॅबचे नूतनीकरण | २०१७-१८ | ४.५० | ४.५० | १.५० | ३.०० | ०.४५ | २.५५ | २.२५ |
| १० | विदर्भ व मराठवाडा करिता दुग्धविकास काग्रक्रम राबविणे | २०१७-१८ | ३४०.०० | १७४.४२ | २८.२२ | १४६.२० | ०.०० | १४६.२० | ७.५० |
| ११ | शेततळयांच्या अस्तरीकरणा करीता अर्थसहाय्य | २०१९-२० | १००.०० | ६०.०० | ०.०० | ६०.०० | २०.०० | ४०.०० | १०.०० |
| **एकूण** | | | **५०२.७५** | **२९१.८६** | **४७.५२** | **२४४.३४** | **२३.४०** | **२२०.९४** | **३८.६५** |